मिरज पंचायत समिती (जि. सांगली) नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१६/प्र.क्र. १५१ /बांधकाम-४
मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: २१ जानेवारी, २०१९

वाचा :-

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,सांगली यांचे पत्र क्र. जिपसां/बांधकाम/ वशि/ ४४०४/२०१२, दि. १२.१०.२०१२

२) अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,सांगली यांचे पत्र क्र. बांधकाम/ प्रकल्प-४/ ११०८/२०१८, दि. ९.०३.२०१८ व क्र. बांधकाम/ प्रकल्प-४/१५७२/२०१८,दि. ७.४.२०१८

**प्रस्तावना :-**

१. मुख्य कार्यकारी अधिकारी व अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली यांनी वरील पत्रान्वये मिरज पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. मिरज पंचायत समिती जि. सांगली येथील कार्यालयाची इमारत ही सन १९६२ मध्ये बांधण्यात आली असून प्रशासकीय कामकाजासाठी सध्या फक्त ६७०चौ.मी. जागा उपलबध आहे. यास्तव कामकाजासाठी गैरसोयीचे होत आहे. सद्य:स्थितीत ही इमारत गळत असून शासकीय कामकाज करणे अत्यंत कठीण होत आहे. त्यामुळे नवीन प्रशासकीय इमारत बांधकाम करण्याकरीता जिल्हा परिषदेने दिनांक २०.०७.२०१२ रोजी ठराव क्र. २४ पारीत केला आहे. सदर पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम पंचायत समितीच्या मालकीचा सिटी सर्व्हे क्र ४२/३९ एकूण क्षेत्रफळ ६१९३ चौ.मी. या जागेमध्ये करण्यात येणार आहे. मिरज पंचायत समिती " अ " गटात मोडत असून अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सांगली यांनी पंचायत समिती मिरज नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाकरीता उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ सा.बां.वि., पुणे यांच्याकडील पत्र क्र.सोलापूर/३०४/ १९५/ २०१२ दि.१९.०५.२०१२ अन्वये माढा तालुका पंचायत समिती नवीन प्रशासकीय इमारतीचा रेखा आराखडा मंजूर केला आहे. सदर आराखड्यानुसार पंचायत समिती मिरज नवीन प्रशासकीय इमारतीचे तळमजला ६०४.९९ चौ.मी. व पहिला मजला ५०९.४२ चौ.मी. असे एकूण १११४.४१ चौ. मी. क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित केले असून, याकरीता अंदाजपत्रकीय रक्कम रु. ४०७.६४ लक्ष इतक्या रक्कमेचा GST सह प्रस्ताव सादर केला आहे. नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकामाचे अंदाजपत्रक सन २०१७-१८ च्या दरसूचीवर आधारीत असून ते उपअभियंता, कार्यकारी अभियंता(बांध) व अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली यांनी साक्षांकीत केले आहे. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली यांनी प्रस्तावासोबत जि.प.च्या ठरावाची प्रत, नमुना नकाशाची प्रत, जागेचा

उतारा, ले-आऊट प्लॅन, साईट प्लॅन, स्थळ दर्शक नकाशा, अस्तित्वातील इमारत बांधकामाचे फोटो इत्यादी कागदपत्रे सादर केली आहेत. प्रस्तावामध्ये GST अंतर्भुत करुन खालीलप्रमाणे परिगणना करण्यात येत आहे.

३. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती मिरज पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाकरीता एकूण रु. ४०७.६४ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

४. मिरज पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम पंचायत समितीच्या मालकीच्या सिटी सर्व्हे क्र ४२/३९ एकूण क्षेत्रफळ ६१९३ चौ.मी. या जागेमध्ये करण्याकरीता एकूण रु. ४,०७,६४,०००/- (रु. चार कोटी सात लक्ष चौसष्ट हजार फक्त) इतक्या सविस्तर अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) नियोजित मिरज पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाकरीता उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ सा.बां.वि., पुणे यांच्याकडील पत्र क्र.सोलापूर/३०४/१९५/२०१२ दि.१९.०५.२०१२ अन्वये मान्यता दिलेल्या माढा तालुका पंचायत समितीच्या मंजूर रेखा आराखड्यानुसार हाती घेताना स्थानिक नगर रचना प्राधिकरणाची तसेच, अग्निशामन यंत्रणेची मंजूरी घेणे बंधनकारक राहील.

२) नियोजित मिरज पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकामाकरीता प्रस्तावित करण्यात आलेल्या आराखड्यात पदाधिकारी यांच्या दालनालगत महिला पदाधिकाऱ्यांसाठी प्रसाधनगृहा-सह विश्रांती कक्षाची व्यवस्था करण्यात यावी.

३) प्रस्तुत प्रशासकीय इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुविजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुनःभर्रण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

४) प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) मिरज पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/ इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर /मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/ अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करुन घेणे बंधनकारक राहील.

६) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करुन, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबंधित कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

७) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबंधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी. या कामावर प्रशासकीय मान्यते पेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती / जिल्हा परिषदेने सोसावा.

८) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

५. मिरज पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकाचा मंजूर सर्वसाधारण गोषवारा खालील प्रमाणे आहे :-

| FINAL ABSTRACT FOR CONSTRUCTION OF MIRAJ P.S. ADMIN., BLDG. | | |
|---|---|---|
| Sr.No. | Description of item | Cost Rs. |
| 1 | Cost Of Work Of office Building | 21754395.00 |
| 2 | Compound wall and Parking Development | 3361347.00 |
| 3 | B.T. Road | 924498.00 |
| | Total (A) | 26040240.00 |
| 4 | Add 18% GST on Non Residential Building | 4687243.00 |
| 5 | Add 11% for Electrification | 2864426.00 |
| 6 | Add 2 % for Water Supply and Sanitation | 520805.00 |
| 7 | Add 2 % for Rain Water Harvesting and Fire Fighting | 520805.00 |
| 8 | Add Furniture and Interior Work | 6000000.00 |
| 9 | Add S.Q.M. Charges | 130000.00 |
| | Total (B) | 14723279.00 |
| | Total (A) + (B) | 40763519.00 |
| | Says Rs | 40764000.00 |

६. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. यावरील खर्च " २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

८. प्रस्तुत कामाची माहिती कंस्ट्रक्शन ट्रॅकर प्रणालीवर अद्ययावत करावी.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०११९१४३७१९९२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAGHUNATH ANNASAHEB NAGARGOJE

Digitally signed by RAGHUNATH ANNASAHEB NAGARGOJE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=decff3a81eacee2237c8c2d29460e7c459d9f7baaab677f7578d952747d49ab2, postalCode=400001, street=RURAL DEVELOPMENT DEPT,BANDHKAM BHAVAN,25MARZBAN ROAD,FORT,MUMBAI, serialNumber=d404eac17c41303f055a321c8b78aa06691d96f89d2b59532f46b0d468148ae1, ou=RURAL DEVELOPMENT DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAGHUNATH ANNASAHEB NAGARGOJE
Date: 2019.01.21 12:44:00 +05'30'

( र. आ. नागरगोजे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद
२) विभागीय आयुक्त पुणे विभाग, पुणे
३) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
४) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो./ मु.मं.ग्रा.स.यो., पुणे
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सांगली
६) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सांगली
७) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद सांगली
८) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद सांगली
९) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा सांगली
१०) गट विकास अधिकारी, पंचायत समिती मिरज, जिल्हा सांगली
११) सभापती, पंचायत समिती मिरज, जिल्हा सांगली
१२) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१३) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, सांगली
१४) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, सांगली
१४) निवड नस्ती,कार्यासन बांधकाम-४ ,ग्राम विकास विभाग,बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ फोर्ट, मुंबई